**आदमी विमा योजनेंतर्गत सन २०१५-१६ च्या विमा हप्त्याची रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळाला अदा करणे.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र. ५६३ /विसयो-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २५.०३.२०१५

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: आआवि-२००७/ प्र.क्र.३५६/ विसयो, दि.१६ ऑक्टोंबर,२००७
२. भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र दि.२८/०४/२०१४
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीयुडी-२०१४ प्र.क्र. ५६३/ विसयो १ दि.२२/०५/२०१४.
४. भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र दि.१६/०७/२०१४
५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीयुडी-२०१४ प्र.क्र. ५६३/ विसयो १ दि.२१/०८/२०१४
६. भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र दि.१६ फेब्रुवारी,२०१५.
७. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीयुडी-२०१४ प्र.क्र. ५६३/ विसयो १ दि. २३.०२.२०१५
८. भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र दि.०७.०३.२०१५.
९. भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र दि.१७.०३.२०१५.

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत आम आदमी विमा योजना राज्यात संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत ग्रामीण भागातील भूमिहीन कुटुंबातील १८-५९ वयोगटातील भूमिहीन कुटुंबातील कमावत्या व्यक्तीला लाभ देण्यात येतो. त्यांचा भारतीय आयुर्विमा महामंडळामार्फत विमा उतरविण्यात येतो. वार्षिक विम्या हप्त्याची प्रति सदस्य रक्कम रु.२००/- इतकी असून रु.१००/- केंद्र शासनामार्फत व रु.१००/- राज्य शासनामार्फत भारतीय आयुर्विमा महामंडळास दिली जाते.

भारतीस आयुर्विमा महामंडळाच्या संदर्भ क्र.८ व ९ येथील पत्रानुसार सन २०१५-१६ करिता वार्षिक विमा नुतनीकरण हप्ता देय आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता आम आदमी विमा योजनेकरिता रु.४२,४५,९७,०००/- इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. आता, भारतीय आयुर्विमा महामंडळास सन २०१५-१६ करिता लाभार्थ्यांच्या विमा नुतनीकरण हप्त्यापोटी रु. २,२८,५८,५००/- (रु. दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठावन्न हजार पाचशे फक्त) रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

वरील बाब विचारात घेऊन आम आदमी विमा योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या सन २०१५-१६ साठीच्या वार्षिक विमा नुतनीकरण हप्त्यापोटी रु. २,२८,५८,५००/- (रु. दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठावन्न हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास अदा करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदर प्रमाणे वार्षिक विमा हप्त्याची रक्कम अदा करण्यासाठी रु. २,२८,५८,५००/- (रु. दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठावन्न हजार पाचशे फक्त) इतका निधी श्री.ज.ह.कांबळे, अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. या खर्चासाठी अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे आणि श्री.ग.कि. वाघ, सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांनी उपरोक्त प्रयोजनासाठी "LIFE INSURANCE CORPORATION OF INDIA, MUMBAI" या नावाने रु. २,२८,५८,५००/- (रु. दोन कोटी अठ्ठावीस लक्ष अठावन्न हजार पाचशे फक्त) इतक्या रकमेचा धनादेश तात्काळ काढावा.

४. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक एन-३, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण,०२- समाज कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, ११०- इतर विमा योजना (००)(०१) आम आदमी योजना (२२३५ ३३८२), ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मधील मंजूर तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२५११०५४०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan K Wagh

Digitally signed by Gajanan K Wagh
DN: CN = Gajanan K Wagh, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.03.25 11:20:06 +05'30'

**( ग.कि.वाघ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकहय भवन,५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
४. महालेखापाल, महाराष्ट्र१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
५. अवर सचिव, व्यय-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी (कार्या विसयो-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवड नस्ती (विसयो-१)